**मा.श्री. अरूण माधव ढवळे, मा. उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश तथा अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांना वेतन व भत्ते अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शाशैशु-२०१९/प्र.क्र.५७/एसएम-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.
दिनांक: २१ मार्च, २०२५.

**वाचा:-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन अधिसूचना क्र.शाशैशु-२०१९/ प्र.क्र.५७/ १९/एसएम-६, दि. २० फेब्रुवारी, २०२०.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन अधिसूचना क्र.शाशैशु-२०१९/ प्र.क्र.५७ (भाग-१)/ एसएम-६, दि. ७ जून, २०२१.
३. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन अधिसूचना क्र.संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.४५७/तंशि-४, दि.३० नोव्हेंबर २०१५.
४. प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/शाशैशु/२०२५/ढवळे/ड-५०४/१०८८, दि.२८.२.२०२५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन ) अधिनियम, २०११ च्या कलम ७ नुसार संदर्भाधीन क्र. (२) येथील अधिसूचनेद्वारे विभागीय शुल्क नियामक समित्या गठीत करण्यात आल्या आहेत. तर कलम ११ नुसार संदर्भाधीन क्र. (१) येथील अधिसूचनेद्वारे पुनरिक्षण समिती गठीत करण्यात आली आहे.

महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन ) अधिनियम, २०११ ( २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक (७) मधील कलम ११ (१) द्वारे प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून शासनाने मा.श्री. अरूण माधव ढवळे, मा. उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश तथा अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांची दि.२०.०२.२०२० रोजीच्या अधिसूचनेद्वारे पुनरिक्षण समितीचे अध्यक्ष म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. परंतु श्री. अरूण माधव ढवळे यांनी केलेल्या कामकाजाकरिता शासनाकडून अद्यापपर्यंत कोणतेही वेतन व भत्ते अदा करण्यात आले नव्हते. त्या कारणास्तव मा.श्री. अरूण माधव ढवळे यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई रिट याचिका क्रमांक ३०५०/२०२३ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने श्री. अरूण माधव ढवळे यांना दि.२७.२.२०२० ते दि.२५.९.२०२१ या कालावधीत वेतन व भत्ते उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दि.३०.११.२०१५ रोजीच्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार अदा करण्याचे आदेश दि.२३.१.२०२५ रोजी दिले आहेत.

श्री. अरूण माधव ढवळे, अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांनी दि.२७.०२.२०२० ते दि.२५.९.२०२१ या कालावधीत केलेल्या कामकाजासाठी उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या दि.३०.११.२०१५ च्या अधिसुचनेतील तरतुदीनुसार वेतन व भत्ते अदा करण्याकरिता परिगणना करण्यात आली असून एकूण रू.३०,९८,८७९/-एवढी रक्कम निश्चित होत असल्यामुळे सदर रक्कम संबंधितांना अदा करणे आवश्यक आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशाप्रमाणे याचिकाकर्ते मा.श्री. अरूण माधव ढवळे, मा. उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश तथा अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांना सदर रक्कम विहित कालावधीत म्हणजेच ६ आठवड्यात अदा करावयाची आहे.

मा.श्री. अरूण माधव ढवळे, मा. उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश तथा अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांना मानधन अदा करण्यासंदर्भात निधी मागणीचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. (४) अन्वये शासनास सादर केला आहे. याअनुषंगाने सन २०२४-२५ या वर्षासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता लेखाशीर्ष (२२०२ आय ४६१) अंतर्गत सहाय्यक अनुदाने या उद्दिष्टाखालील सध्या रू.१९,८४,०००/- उपलब्ध आहेत. मा.श्री. अरूण माधव ढवळे, मा. उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश तथा अध्यक्ष, पुनरिक्षण समिती यांना रू.३०,९८,८७९/- एवढी रक्कम अदा करणे आवश्यक आहे. श्री. ढवळे यांना संपूर्ण रक्कम अदा करण्यासाठी रू.११,१४,८७९/- एवढी रक्कम कमी पडत आहे. सदर प्रकरणी कमी पडणारी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे अर्थसंकल्प कक्षाकडून उपलब्ध होणार आहे.तेव्हा प्रथमत: उपलब्ध असलेला रू.१९,८४,०००/- (अक्षरी रूपये एकोणीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यासंदर्भात होणारा खर्च मागणी क्र. ई-२ २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण ००१, संचालन व प्रशासन (००) (०६), महाराष्ट्र शैक्षणिक संस्था (शुल्क विनियमन) अधिनियम, २०११ अंतर्गत, शुल्क निर्धारण समिती (२२०२I४६१) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.७.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६६/व्यय-५, दि.१०.३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२११७५८०११८२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT., 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF01D0AB2AFFB124678E1A586450069BBD9E2CBC928A89E57C1B37706CB9F428, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2025.03.21 17:58:56 +05'30'

**(समीर सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
११. महालेखापाल ( लेखा ), महाराष्ट्र-१, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३. अर्थसंकल्प कक्ष, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (एसएम-६).